मंत्रालयीन विभागातील इंग्रजी लघुलेखक/टंकलेखक यांना मराठी लघुलेखन/टंकलेखनाचे प्रशिक्षण देण्याबाबत

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : एसटी-१५९३/४२४/१४-अ,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १९ एप्रिल १९९३.

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टंलप्र-१०८१/सीआर-३७४/२०-ब, दिनांक ६ मे १९९१.

परिपत्रक :-

शासन व्यवहारात मराठी भाषेचा वापर जास्तीत जास्त करण्याचे शासनाचे धोरण असून परिणामतः इंग्रजी भाषेतील कामकाजाचे प्रमाण दिवसेंदिवस कमी होत आहे. त्यामुळे इंग्रजी लघुलेखक/टंकलेखकांना इंग्रजी लघुलेखन/टंकलेखनाचे पुरेसे काम नसल्यामुळे त्यांच्या सेवा पूर्णतः उपयोगात आणता येत नाहीत असे आढळून आले आहे. त्यांच्या सेवेचा उपयोग शासकीय कामकाजासाठी योग्य प्रकारे करून घेता यावा याकरिता त्यांनी मराठी लघुलेखन व टंकलेखन याबाबतचे प्रशिक्षण घेणे अत्यंत आवश्यक आहे. या दृष्टीकोनातून इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांना मराठी लघुलेखन/मराठी टंकलेखन परीक्षा सक्तीची करण्याबाबतचे आदेश शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग, क्र. टंलप्र-१०८१/सीआर-३४४/२०-ब, दिनांक ६ मे, १९९१ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार जे इंग्रजी लघुलेखक/टंकलेखक सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकास म्हणजेच दि. ६ मे १९९१ रोजी शासकीय सेवेत होते त्यांनी दि. ६ मे १९९५ पूर्वी व ज्यांची नियुक्ती दि. ६ मे १९९१ नंतर झाली आहे/होईल, त्यांनी नियुक्ती झाल्यानंतर, मराठी लघुलेखन/टंकलेखनाचे प्रशिक्षण घेऊन विहित परीक्षा ४ वर्षांच्या आत उत्तीर्ण करणे आवश्यक आहे. अन्यथा त्यांची पुढील वेतनवाढ, ते सदर परीक्षा उत्तीर्ण होईपर्यन्त रोखण्यात येणार आहे.

२. वरील आदेशांची अंमलबजावणी मंत्रालयीन विभागांकडून योग्य प्रकारे केली जात नाही, तसेच इंग्रजी लघुलेखक/टंकलेखक मराठी लघुलेखन/टंकलेखनाचे प्रशिक्षण घेण्यासाठी फारसे इच्छुक नाहीत असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. या परिस्थितीत प्रशिक्षण घेण्यास इच्छुक नसलेल्या अथवा प्रशिक्षण पूर्ण करून विहित कालावधीत परीक्षा उत्तीर्ण न होणाऱ्या इंग्रजी लघुलेखक/टंकलेखकांच्या बाबतीत त्यांची वेतनवाढ रोखण्याखेरीज पुढीलप्रमाणे कारवाई करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन आहे :-

१] ज्या इंग्रजी लघुलेखक/टंकलेखकाचे वय ५० वर्षे पूर्ण झाले आहे अशांच्या बाबतीत त्यांच्या सेवेचा उपयोग करून घेण्याच्या दृष्टीने त्यांची, बदली जेथे इंग्रजीचा वापर अपरिहार्य आहे अथवा अधिक प्रमाणात होतो अशा न्यायालयाशी संबंधित अथवा अन्य कार्यालयात करणे.

२] त्यांना लघुलेखक संवर्गातील पुढील पदोन्नतीकरिता पात्र न समजणे.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी उपरोक्त परिस्थिती त्यांच्या विभागातील सर्व इंग्रजी लघुलेखक/टंकलेखक यांच्या निदर्शनास आणावी आणि आवश्यक ते प्रशिक्षण पूर्ण करून विहित कालावधीत परीक्षा उत्तीर्ण होण्याबाबतच्या सूचना द्याव्यात. तसेच जे इंग्रजी लघुलेखक/टंकलेखक सदर प्रशिक्षण घेण्यास नकार देतील त्यांच्या बाबतचा अहवाल सामान्य प्रशासन विभागास तात्काळ पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
[मा. ना. जोशी],
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व मंत्रालयीन विभाग [आस्थापना],
सामान्य प्रशासन विभाग, का. क्र. २०-ब,
निवड नस्ती.